**नागपूर सुधार प्रन्यास**

**नागपूर सुधार प्रन्यास (सेवांचे वर्गीकरण, सेवाभरती व पदोन्नती) नियमांना शासन मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. नासुप्र-२०१६/प्र.क्र.१११/नवि-२६**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १२ मे, २०१७

**वाचा** :- १) शासन निर्णय क्र.नासुप्र-२२०४/१०८४/प्र.क्र.१७२/०४/नवि-२६ दिनांक १ जुलै, २००५

२) शासन निर्णय क्र. नासुप्र-२०१५/प्र.क्र.९७/नवि-२६ दिनांक १४ डिसेंबर, २०१५, दि.२२/१२/२०१५ , दिनांक १०/०२/२०१६

३) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांचे अर्धशासकीय पत्र क्र.४२०७ दिनांक ०३/०८/२०१६

४) कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.आ.वि./से.भ.नियम/७२४६ दि.५/११/२०१६

५) सभापती, नासुप्र यांचे पत्र क्र.साप्रवि/आ.वि./से.भ.नि./३०२७ दिनांक २५/०४/२०१७

**प्रस्तावना :-**

नागपूर सुधार प्रन्यास हे नागपूर शहराच्या हद्दीतील नवीन भागांचा विकास आणि शहराच्या पायाभूत सुविधांचे परिरक्षण करण्याच्या उद्देशाने सन १९३७ साली स्थापन करण्यात अलेले स्थानिक नागरी शासकीय निकाय आहे. नागपूर सुधार प्रन्यास नागपूर शहराचे क्षेत्र विकास प्राधिकरण असून, नागपूर महानगरपालिकेच्या सहयोगाने शहराच्या विकासाकरिता कार्यरत आहे. नागपूर शहराचे नियोजनबध्द महानगरात रुपांतर करण्यात नागपूर सुधार प्रन्यासने मोलाची भूमीका बजावली आहे.

नागपूर सुधार प्रन्यासच्या मुख्य जबाबदा-यामध्ये गृहनिर्माण योजना, काही शहरी भागांची पुनर्बांधणी, शहरातील रस्त्यांचे परिरक्षण, जलनि:स्सारण व स्वच्छता आणि शहर सुधारणा योजनांची अंमलबजावणी इ.चा समावेश आहे. नागपूर सुधार प्रन्यासच्या तांत्रिक विभागाकडून अभिन्यास मंजूरी, भूखंडकाचे नियमितीकरण करणे, बांधकामाचे नकाशे मंजूर करणे आणि अभिन्यासामधील विविध विकास कामे पूर्ण करुन नागरी सुविधा उपलब्ध करुन देणे व विकसित अभिन्यास नागपूर महानगरपालिकेस देखभालीसाठी हस्तांतरीत करणे, इत्यादी कामे करण्यात येतात. नागपूर सुधार प्रन्यासच्या अतांत्रिक विभागाकडून आस्थापनाविषयक प्रकरणे हाताळणे, जमीन संपादित करणे, भूखंडकाची लिज डीड करणे, शहरामधील उद्याने विकसित करणे व इस्टेटीसंबंधातील बाबी हाताळणे इ. कामे करण्यात येतात. नागपूर सुधार प्रन्यासने अनधिकृत अभिन्यासांचे नियमितीकरण करण्याकरिता नियोजनबध्द प्रकल्प हाती घेतला असून, ज्यायोगे अधिक निवासी भूखंड उपलब्ध होऊ शकतील. नागपूर सुधार प्रन्यासने नागपूर शहरात सार्वजनिक-खाजगी भागीदारी तत्वावर विविध विकास प्रकल्प हाती घेतले आहेत. याशिवाय नागपूर सुधार प्रन्यासकडून नागपूर महानगर प्रदेश विकास आराखडा तयार करण्यात आला आहे. नागपूर महानगर क्षेत्रात सुमठाणा-कोतेवाडा-सोंडपार-

जामठा-परसोडी तसेच खडका-किरमिटी-शिवमडका-समुठाणा-पांजरी अशा दोन सुधार योजनांचे कार्यान्वयन प्रगतीपथावर आहे.

नागपूर शहराच्या नियोजनबध्द विकासाच्या अनुषंगाने नागपूर सुधार प्रन्यासकडून करण्यात येणा-या विविध विकास कामांच्या पार्श्वभूमीवर प्रन्यासच्या कामकाजात लक्षणीय वाढ झालेली आहे. सबब प्रन्यासच्या सक्षमीकरणाकरिता पुरेसा अधिकारी /कर्मचारीवृंद असणे आवश्यक आहे. या पार्श्वभूमीवर नागपूर सुधार प्रन्यासच्या विश्वस्त मंडळाने ठरावांद्वारे वेळोवेळी दिलेल्या मान्यतेनुसार व सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांच्या प्रस्तावानुसार नागपूर सुधार प्रन्यासच्या आकृतीबंधास उपरोक्त संदर्भाधीन क्र.०२ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. या मंजूर आकृतीबंधानुसार नागपूर सुधार प्रन्यासच्या आस्थापनेवरील अधिकारी / कर्मचारी यांचे सेवाप्रवेश नियम तयार करण्याच्या उद्देशाने नागपूर सुधार प्रन्यासने संदर्भाधीन क्र.०३, ०४ व ०५ येथील पत्राद्वारे नागपूर सुधार प्रन्यासच्या आस्थापनेवरील विविध संवर्गातील पदांचे सेवाप्रवेश नियम शासनास मान्यतेसाठी सादर केले आहेत. सदर सेवाप्रवेश नियमांच्या छाननीअंती नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर करिता विविध संवर्गाच्या पदांच्या सेवाप्रवेश नियमास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम १९३६ मधील कलम ८९ (२) मधील तरतुदीनुसार, नागपूर सुधार प्रन्यासने संदर्भाधीन क्र.०३, ०४ व ०५ येथील पत्रान्वये, शासन मान्यतेस्तव सादर केलेले, " नागपूर सुधार प्रन्यास (सेवाप्रवेश, व सेवांचे वर्गीकरण) नियम २०१६" यांचा विचार करुन त्यात आवश्यक त्या सुधारणा करुन सोबत जोडलेल्या नियमावलीस नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम १९३६ चे कलम ८९ मधील पोटकलम (l) मधील उपकलम (क) अन्वये असलेल्या अधिकारात, महाराष्ट्र शासनातर्फे मान्यता दिलेले व यापूर्वी नागपूर सुधार प्रन्यासने केलेले सेवाभरती / पदोन्नतीसाठी पारित केलेले सर्व ठराव / नियम निरसित करुन, तसेच सरळसेवेने अथवा कोणत्याही प्रकारे नवीन पदांची भरती करता येणार नाही या अटीच्या अधीन राहून, या आदेशाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** या नियमावलीस " नागपूर सुधार प्रन्यास (सेवाप्रवेश, व सेवांचे वर्गीकरण) नियम २०१७" असे संबोधण्यात यावे. [सोबत, (१) नागपूर सुधार प्रन्यास (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०१७ (२) नागपूर सुधार प्रन्यास (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०१७ अंतर्गत परिशिष्ट-१ (३) नागपूर सुधार प्रन्यास (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०१७ अंतर्गत परिशिट-२]

**०३.** सदर नियमावली सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांनी तात्काळ शासन राजपत्रात प्रसिध्द करावी. हे नियम शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

**०४.** या आदेशानुषंगीक सर्व सांविधानिक बाबींची पूर्तता सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांनी करावयाची आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०५१२१७०००९०३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.05.12 17:06:35 +05'30'

(ज.ना.पाटील)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
४) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
५) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

# नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर

# सेवा प्रवेश नियम, २०१७

# नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर

# नागपूर सुधार प्रन्यास (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१७

**नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम १९३६:**

नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम १९३६ (सी.पी. कलम क. XXXV-१९३६) च्या कलम ८९ मधील पोटनियम (१) मधील उपकलम (क) अन्वये असलेल्या अधिकारात, यापूर्वी अंमलात असलेले या नियमामध्ये नमूद पदाचे सेवाप्रवेश नियम, वेतनश्रेणी तसेच तत्संबधात यापूर्वी करण्यात आलेले ठराव व आदेश अधिक्रमित करुन नागपूर सुधार प्रन्यास याद्वारे नागपूर सुधार प्रन्यासमधील या नियमांमध्ये नमूद पदांवर करावयाच्या नियुक्त्यांचे नियमन व सेवांचे वर्गीकरण करण्यासाठी खालीलप्रमाणे नियम करीत आहे

<u>**नियम**</u>

**१. संक्षिप्त नांव, प्रारंभ व व्याप्ती:-**

१. या नियमांना ''नागपूर सुधार प्रन्यास सेवा (सेवा प्रवेश सेवांचे वर्गीकरण) नियम २०१७'' असे संबोधण्यात येईल.

२. हे नियम नागपूर सुधार प्रन्यासमधील संबंधित पदावरील नियुक्त्यांना लागू होतील, मात्र अन्यथा नमूद केले नसल्यास अंशकालीन स्वरुपाच्या नियुक्त्या, कंत्राटी पध्दतीने किंवा रोजंदारी तत्वावरील नियुक्त्या तसेच मानसेवी स्वरुपाच्या नियुक्त्यांना लागू होणार नाहीत.

२. (अ) **व्याख्या :-**

**विषय किंवा संदर्भानुसार अन्य अर्थ अभिप्रेत नसल्यास या नियमांसाठी:-**

१. ''अधिनियम'' म्हणजे नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम १९३६ (सन १९३६ चा मध्यप्रांत व वऱ्हाडचा अधिनियम क्रमांक ३६)
२. ''परिशिष्ट'' म्हणजे या नियमांना जोडलेली परिशिष्टे.
३. ''सभापती'' म्हणजे नागपूर सुधार प्रन्यासचे सभापती.
४. "प्रन्यास" म्हणजे नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम, १९३६ चा मध्यप्रांत याद्वारे निर्माण केलेले व अंतर्गत केलेले नागपूर सुधार प्रन्यास.
५. ''पदवी'' म्हणजे मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी.
६. ''मान्यताप्राप्त संस्था'' म्हणजे शासनाने मान्यता दिलेल्या संस्था.
७. ''विभागीय परीक्षा'' म्हणजे कर्मचाऱ्याचा संबंधित पदावरील परिविक्षा कालावधी संपुष्टात आणून त्याला प्रन्यासच्या सेवेत नियमित करण्याकरिता प्रन्यास विहित करेल अशी परीक्षा.
८. ''कर्मचारी'' म्हणजे या नियमांच्या परिशिष्टात नमूद केलेले प्रन्यास अधिकारी किंवा कर्मचारी.
९. ''शासन'' म्हणजे महाराष्ट्र शासन.
१०. ''अर्हताप्राप्त कर्मचारी'' म्हणजे या नियमांच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेली अर्हता धारण करणारे कर्मचारी. या नियमांत वापरण्यात आलेले परंतु व्याख्या न केलेले शब्द किंवा शब्द समूहांचा अर्थ अधिनियमात दिल्यानुसार असेल.

**(ब) क्षेत्रांचे वर्गीकरण-** (Classification of Services)

**१) तांत्रिक सेवा (अभियांत्रिकी) :-** ज्या पदावरील नियुक्तीसाठी मान्यताप्राप्त विद्यापीठ/अभिमत विद्यापीठ/राज्य तंत्रशिक्षण मंडळ (Board of Technical Education) वा केंद्रिय तंत्रशिक्षण मंडळ (Board of Central Technical Education) तंत्रशिक्षण परिषद (Technical Council) वा यांचेमार्फत चालविले जाणारे विविध तांत्रिक व

अभियांत्रिकी विषयक अभ्यासक्रम अशी किमान शैक्षणिक अर्हता विहित केली असेल, अशा पदांना ''तांत्रिक संवर्ग'' संबोधण्यात येईल व अशा पदाची सेवा ''तांत्रिक सेवा'' संबोधिली जाईल.

२) **उद्यान सेवा:-** नागपूर सुधार प्रन्यासच्या ज्या पदावरील नियुक्तीसाठी कृषी/उद्यान विषयक अभ्यासक्रम अशी किमान शैक्षणिक अर्हता विहित केली असेल, अशा पदांना ''उद्यान सेवा'' संबोधण्यात येईल.

३) **लेखा सेवा:-** नागपूर सुधार प्रन्यासच्या आर्थिक व्यवस्थापनाशी संबंधित (अर्थसंकल्प, लेखा, आक्षेप निराकरण व खर्च व्यवस्थापन ई.) सेवा या ''लेखा सेवा'' संबोधण्यात येईल.

४)**विधी सेवा** :- नागपूर सुधार प्रन्यासच्या विधी व्यवस्थापनाशी संबंधीत सेवा, अशा पदांना “विधी सेवा” संबोधण्यात येईल.

५)**नगररचना सेवा** :- नागपूर सुधार प्रन्यासच्या नगररचना व्यवस्थापनाशी संबंधीत सेवा, अशा पदांना “नगररचना सेवा” असे संबोधण्यात येईल.

६) **प्रशासकीय सेवा:-** उपरोक्त (१) ते (५) मध्ये नमूद केलेल्या सेवा वगळता अन्य सर्व सेवा या ''प्रशासकीय सेवा'' संबोधण्यात येईल.

## ३. नेमणूकीची पध्दत व अर्हता:-

**(१)**प्रन्यासमधील विविध पदांवर नियुक्तीसाठी कार्यपध्दती “परिशिष्ट-१” मध्ये विहीत केल्यानुसार व संबंधित पदाकरिता शिक्षण, अनुभव इ. आवश्यक अर्हता “परिशिष्ट-२” मध्ये विहीत केल्याप्रमाणे असतील, याशिवाय शासनाचे अनुकंपा तत्वावरील नियुक्तीचे धोरण प्रन्यासला लागू राहील.

**(२)** भारतीय नागरीकत्व आणि महाराष्ट्र राज्याचे अधिवास प्रमाणपत्र:- उमेदवार भारताचा नागरीक असावा आणि महाराष्ट्रात १५ वर्ष अधिवास (Domicile) करीत असल्याबाबत सक्षम प्राधिकरणाचे प्रमाणपत्र त्याने अर्जासोबत सादर करणे आवश्यक असेल.

**(३)** संगणक हाताळणी/वापराबाबतच्या ज्ञानाची आवश्यकता:- “परिशिष्ट-२” मध्ये विहीत केलेल्या अर्हते व्यतिरिक्त वाहनचालक आणि गट ''ड'' ची पदे वगळून इतर सर्व पदावरील नेमणूकीसाठी/पदोन्नतीसाठी शासन

वेळोवेळी आदेश काढून निश्चित करेल असे संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान, एक अतिरिक्त आवश्यक अर्हता असेल.

(४) वयोमर्यादा :-प्रन्यासमधील कोणत्याही पदांवर नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी किमान व कमाल वयोमर्यादा महाराष्ट्र शासनाच्या प्रचलित नियमानुसार राहील.

(५) पदोन्नती व नामनिर्देशनाद्वारे करावयाच्या नियुक्त्यांचे प्रमाण:-

नामनिर्देशन वा पदोन्नतीचे प्रमाण ''परिशिष्ट-२'' मध्ये संबंधित पदासमोर दर्शविल्यानुसार असेल.

**४. पदोन्नतीने नेमणूक करणे:-** पदोन्नतीने करावयाची कोणतीही नियुक्ती, ''जेष्ठता-नी-पात्रता'' या तत्वावर नियमित अर्हताप्राप्त कर्मच्याऱ्यामधून केली जाईल. याकरिता गोपनीय अहवालाची किमान आवश्यक सरासरी प्रतवारी याबाबत शासनाचे प्रचलित निकष लागू राहतील.

**५. नियुक्तीस शासनाची मान्यता:-** ज्या पदाच्या नियुक्तीस/पदोन्नतीस शासनाची मान्यता आवश्यक आहे, अशा प्रकरणी शासनाची मान्यता मिळेपर्यंत संबंधित अधिकाऱ्याचा त्यांच्या पूर्वपदावरील हक्क कायम राहील.

**६. प्रतिनियुक्तीद्वारे नेमणूक:-** या नियमांमध्ये विहित केलेल्या पध्दतीनुसार ज्या पदांवर प्रतिनियुक्तीद्वारे नेमणूक करण्याची तरतूद आहे अशी पदे राज्य शासनाच्या अधिकाऱ्यामधून प्रतिनियुक्तीने भरता येतील.

**७. परिविक्षाधीन कालावधी:-** प्रन्यासमध्ये नामनिर्देशनाने नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांसाठी त्यांच्या नेमणूकीच्या मूळ दिनांकापासून दोन वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी असेल. अशा उमेदवारांचे परिविक्षाधीन कालावधीतील काम समाधानकारक नसल्यास अपवादात्मक बाब म्हणून आणि तत्संबंधी कारणे नमूद करुन परिविक्षा कालावधी पुढील एक वर्षापर्यंतच वाढविता येईल. तद्नंतरही या वाढीव कालावधीत काम समाधानकारक नसल्यास सदर व्यक्तीची सेवा समाप्त करण्यात येईल.

**८. विभागीय परीक्षा व प्रशिक्षण:-**

(१) प्रन्यासमधील नामनिर्देशनाने नियुक्त केलेल्या सहाय्यक अभियंता श्रेणी-२, कनिष्ठ अभियंता, स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक, व कनिष्ठ लिपीक टंकलेखक या पदावरील उमेदवारांनी प्रन्यासने विहीत केलेली विभागीय

परीक्षा परिविक्षा कालावधीमध्ये उत्तीर्ण करणे आवश्यक राहील. विभागीय परीक्षा उत्तीर्ण करण्यास उमेदवारांना तीन संधी देण्यात येतील. त्यानंतरही उमेदवार विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील. एखाद्या वर्षी जर कोणत्याही कारणास्तव परीक्षा घेण्यात आली नाहीतर कालावधी व संधीची गणना करताना वगळण्यात येईल.

(२) प्रन्यासच्या सर्व कर्मचाऱ्यांना प्रन्यास वेळोवेळी ठरवून देईल असे सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण घेणे आवश्यक राहील.

**९. प्रन्यास सेवेतील पदावर नियुक्तीसाठी अनर्हता:-**

**एखाद्या व्यक्तीस:-**

क) कोणत्याही स्थानिक प्राधिकरणाच्या सेवेतून किंवा कोणत्याही सरकारी सेवेतून गैरवर्तणुकीबद्दल काढून टाकण्यात आलेले असेल किंवा बडतर्फ करण्यात आले असेल किंवा सेवेतून कमी केले असेल किंवा,

ख) ज्यामध्ये नैतीक अध:पतनाच्या / फौजदारी गुन्ह्याच्या संबंधात सिध्ददोष ठरविण्यात आले असेल, किंवा

ग) जर त्याच्या एकाहून अधिक पत्नी हयात असतील आणि स्त्री उमेदवारांच्या बाबतीत तिचा पती हयात असतांना, जर त्याने / तिने अन्य व्यक्तीशी विवाह केला असेल, किंवा

घ) जर त्यास/तीस दोन पेक्षा अधिक हयात अपत्य असतील, (यात दुसऱ्यावेळी जुळी अपत्ये झाल्यास ती बाब वगळून) किंवा

च) मा.न्यायालयात ज्या गुन्ह्यासाठी कैदेची शिक्षा फर्मावता येते, अशा गुन्ह्यासाठी सहा महिन्याहून अधिक मुदतीची कैदेची शिक्षा झाली असेल व ती शिक्षा अपील वा पुनरीक्षणात रद्द झाली नसेल, अशी व्यक्ती किंवा,

छ) प्रन्यासच्या सेवेत असतांना सिध्दापराध होऊन सहा महिन्यापेक्षा अधिक मुदतीची कैदेची शिक्षा झाली असेल व ती शिक्षा अपील वा पुनरीक्षणात रद्द झाली नसेल अशी व्यक्ती प्रन्यासच्या सेवेत नेमणूक देण्यास वा नेमणूक चालू ठेवण्यास अपात्र समजली जाईल.

## १०. प्रन्यास सेवेतील पदांवरील आरक्षण :-

प्रन्यासच्या सेवेतील पदांना शासनाच्या प्रचलित धोरणानुसार आरक्षण लागू असेल, यामध्ये मागासवर्गीयांसाठी आरक्षण (सामाजीक आरक्षण) आणि समांतर आरक्षणा अंतर्गत अपंग, महिला, माजी सैनिक, प्रकल्पग्रस्त, खेळाडू यांचेकरिता शासनाचे धोरणानुसार आरक्षण लागू राहील.

## ११. शारिरीक पात्रता प्रमाणपत्र चारित्र्य पडताळणी अहवाल :-

प्रन्यास सेवेतील कोणत्याही पदावरील नामनिर्देशनाने नियुक्ती :-

अ) जिल्हा शल्य चिकित्सक यांचे विहित नमुन्यातील आरोग्यविषय वैद्यकीय प्रमाणपत्र सादर केल्यानंतर, आणि

ब) उमेदवाराच्या पूर्वचारित्र्य पडताळणीबाबत (Verification of Antecedents) सक्षम प्राधिकाऱ्यांकडून अहवाल प्राप्त झाल्यानंतर केली जाईल.

क) याबाबत सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडील शासन परिपत्रक क्र.चापअ-१००८/प्र.क्र.५७/२००८/१६अ दिनांक ३०/९/२००८ तसेच याबाबत सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडून वेळोवेळी निर्गमित केलेले व करण्यात येणारे आदेश लागू राहतील.

## १२. प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष दबावतंत्राचा वापर :-

कोणत्याही उमेदवाराच्या नियुक्ती संदर्भात प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणण्याचा केलेला प्रयत्न हा त्या उमेदवाराला त्या पदावरील नियुक्तीसाठी अनर्ह करणारा ठरेल.

**१३.** हे नियम अस्तित्वात येण्यापूर्वी विहित मार्गाने झालेल्या सरळसेवा नियुक्त्यांना शासनाने अन्यथा स्वतंत्र लेखी कारणे नमूद करुन निर्देश दिले नसतील तर या नियमातील तरतुदीमुळे बाधा येणार नाही.

**१४.** वेळोवेळी सेवाभरती/वयोमर्यादा इ. बाबत निर्देश देणारे राज्यशासनाचे नियम, अधिनियम, निर्णय व न्यायनिर्णय या नियमात सुधारणा (Amendment) करण्यात येईपर्यंत प्रचलित शासन निर्णय / न्याय निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

**१५.** या नियमाचे अर्थासंबंधी कोणताही वाद/अडचण उद्भवल्यास याबाबत शासनाचा निर्णय अंतीम राहील.

**सभापती**
**नागपूर सुधार प्रन्यास नागपूर.**

## वैद्यकीय प्रमाणपत्राचा नमुना
## (नियम ११ (अ) पहा)

मी याद्वारे प्रमाणीत करतो / करते की,---------------------------------------------------- नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांच्या ( ) संवर्गातील ( ) पदावर नूमणूक करण्यासाठी असलेले उमेदरावाराची तपासणी केली आणि त्याला / तिला ----------------------------------------(अतिरिक्त (सांसर्गिक किंवा अन्य ) कोणताही रोग, शारिरीक दौर्बल्य किंवा शारिरीक अपंगत्व असल्याचे आढळून आलेले नाही, ही गोष्ट ( ) कार्यालयात ( ) म्हणून नेमणूकीसाठी अनर्ह ठरविणार आहे असे मला वाटत नाही. श्री./श्रीमती.--------------------------------------------------------------------यांच्या स्वत:च्या निवेदनावरुन त्यांचे /तिचे वय ----------- वर्षे आहे आणि दिसण्यावरुन तो / ती सुमारे----------- वर्ष वयाचा / वयाची आहे. त्याला / तिला लस टोचण्यात आली आहे.

ओळख चिन्हे ------------------------------

डाव्या हाताच्या अंगठ्याचा ठसा------------------------------

वैद्यकीय अधिका-याचे पदनाम ------------------------------

वैद्यकीय अधिका-याचे नाव / पदनाम, शिक्का व दिनांकित स्वाक्षरी

------------------------------

# नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर

## नागपूर सुधार प्रन्यास सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०१७

## परिशिष्ट-१

### नागपूर सुधार प्रन्यास (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम २०१७ अंतर्गत सेवा भरतीसाठी अनुसरावयाची कार्यपध्दती

**१. उमेदवार निवड समिती :-**

नागपूर सुधार प्रन्यासच्या पदावर नियुक्तीकरिता खालीलप्रमाणे गठीत समित्या, गठीत करण्यात आलेल्या दिनांकापासून एक वर्ष कालावधीकरिता अथवा भरती प्रक्रिया पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीकरिता (यातील जो कालावधी कमी असेल त्या कालावधीकरिता) वैध राहतील.

(अ) प्रन्यासमधील मुख्य अभियंता या पदावरील पदोन्नती करिता गठित समिती :-

| | | |
|---|---|---|
| १ | सभापती, नागपूर सुधार प्रन्यास | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर | सदस्य |
| ३ | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर | सदस्य |
| ४ | सहसंचालक, नगररचना, नागपूर | सदस्य |
| ५ | महाव्यवस्थापक, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ६ | कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ७ | आस्थापना अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य सचिव |

(ब) अधिक्षक अभियंता / उपसंचालक, नगररचना / कार्यकारी अधिकारी या पदांकरीता विभागीय पदोन्नती निवड समिती :-

| | | |
|---|---|---|
| १ | सभापती, नागपूर सुधार प्रन्यास | अध्यक्ष |
| २ | मुख्य अभियंता, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ३ | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर | सदस्य |
| ४ | सहसंचालक, नगररचना, नागपूर | सदस्य |
| ५ | महाव्यवस्थापक, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ६ | कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ७ | आस्थापना अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य सचिव |

(क) प्रशासकीय व तांत्रिक शाखेतील गट "अ" व गट "ब" मधील (वरील नमूद "अ" व "ब" मधील संवर्ग वगळून) पदाकरीता विभागीय पदोन्नती निवड समिती

| | | |
|---|---|---|
| १ | सभापती, नागपूर सुधार प्रन्यास | अध्यक्ष |
| २ | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर | सदस्य |
| ३ | महाव्यवस्थापक, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ४ | अधीक्षक अभियंता (मुख्याल) नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ५ | कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ६ | आस्थापना अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य सचिव |

(ड) प्रशासकीय व तांत्रिक शाखेतील गट "क" व गट "ड" मधील पदाकरीता विभागीय पदोन्नती निवड समिती

| | | |
|---|---|---|
| १ | महाव्यवस्थापक, नागपूर सुधार प्रन्यास | अध्यक्ष |
| २ | अधीक्षक अभियंता (मुख्यालय) नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ३ | कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ४ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी | सदस्य |
| ५ | आस्थापना अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य सचिव |

**टिप :-** समितीतील सदस्यांपैकी ज्या सदस्यांचा निवड सूचिमध्ये समावेश असेल, त्यांच्याऐवजी समकक्ष दूसरा अधिकारी नियुक्त करण्याचा अधिकार सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांना राहील, तसेच समितीमध्ये मागासवर्गीय, महिला व अल्पसंख्याक यांचे प्रतिनिधी उपलब्ध नसल्यास याकरीता त्या त्या प्रवर्गातील उचित अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्याचा अधिकार सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांना राहील.

(इ) नागपूर सुधार प्रन्यासच्या आस्थापनेवर सरळ भरतीने पदे भरण्याकरीता निवड समिती.

| | | |
|---|---|---|
| १ | सभापती, नागपूर सुधार प्रन्यास | अध्यक्ष |
| २ | मुख्य अभियंता, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ३ | महाव्यवस्थापक, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ४ | कार्यकारी अधिकारी, नगापूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ५ | जिल्हा सेवा योजना अधिकारी, नागपूर | सदस्य |
| ६ | जिल्हा समाजकल्याण अधिकारी, नागपूर | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ७ | जिल्हा आदिवासी विकास अधिकारी, नागपूर | सदस्य |
| ८ | जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, नागपूर | सदस्य |
| ९ | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, नागपूर | सदस्य |
| १० | आस्थापना अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य सचिव |

**टिप :-** समितीमध्ये मागासवर्गीय, महिला व अल्पसंख्याक यांचे प्रतिनिधी उपलब्ध नसल्यास याकरीता त्या त्या प्रवर्गातील उचित अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्याचा तसचे आवश्यकतेनुसार विषयतज्ञास बोलविण्याचा अधिकार सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांना राहील.

(ई) विभागीय परीक्षा समिती.

| | | |
|---|---|---|
| १ | महाव्यवस्थापक, नागपूर सुधार प्रन्यास | अध्यक्ष |
| २ | मुख्य अभियंता, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ३ | उपसंचालक, नगररचना, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ४ | कार्यकारी अधिकारी, नगापूर सुधार प्रन्यास | सदस्य |
| ५ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी | सदस्य |
| ६ | आस्थापना अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास | सदस्य सचिव |

## २. नामनिर्देशनाद्वारे नेमणूकीकरीता कार्यपध्दती :-

**अ)** एखाद्या पदावरील नियुक्तीसाठी प्रन्यासाच्या संकेतस्थळावर, राज्यस्तरावरील नामांकित अशा मराठी / इंग्रजी वृत्तपत्रातीद्वारे प्रसिध्द करण्यात आलेल्या जाहिरातीला अनुसरुन आणि प्रन्यासच्या सूचना फलकावरील सूचनेस अनुसरुन विहित मुदतीत प्राप्त झालेल्या अर्जाचाच विचार करता येईल तसेच सेवायोजन कार्यालयाकडून पात्र उमेदवारांची नावे मागविण्यात येतील.

**ब)** उमेदवाराने अर्जात दिलेल्या तपशिलाबाबत अधिक माहिती मागविण्याचा अधिकार सभापतींना असेल.

**क)** जाहिरातीत अथवा सेवा विनिमय केंद्राकडे पाठविलेल्या मागणीपत्रात लेखी चाचणीचा उल्लेख असल्यास अशा उमेदवारांना लेखी चाचणी द्यावी लागेल. परंतु जाहिरातीत नमूद केलेली पदसंख्या आणि पात्र उमेदवारांची संख्या

लक्षात घेऊन अशी चाचणी न घेण्याचा निर्णय सभापतींना घेता येईल. अशा परिस्थितीत संबंधित पदाकरिता किमान आवश्यक शैक्षणिक अर्हता परिक्षेतील गुण विचारात घेण्यात येतील.

**ड)** जाहिरातीत नमूद नियुक्त करावयाच्या उमेदवारांची पदसंख्या रिक्त पदांच्या उपलब्धतेनुसार कमी-अधिक करण्याचे अधिकार सभापतींना राहतील.

**इ)** लेखी परीक्षा व मुलाखतीचे गुण शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राहतील तथापि अपवादात्मक परिस्थितीत गुण ठरविण्याचे अधिकार सभापतींना राहतील. तसेच नियुक्तीसंबंधी अन्य सर्व निर्णय घेण्याचे अधिकार सभापतींना राहतील.

**ई)** नामनिर्देशनाने नियुक्ती करतांना शासनाच्या मार्गदर्शक तत्वांचा लागू असेल तेथे अवलंब करण्यात यावा. शासनाने निर्णय घेतल्यास परीक्षेतील गुणांच्या आधारे निवड करण्याचा अधिकार राहील.

## ३. पदोन्नतीने नेमणूकीकरीता कार्यपध्दती :-

**अ)** पुढील एक वर्षाच्या कालावधीत प्रत्येक संवर्गात पदोन्नतीने किती पदे भरावी लागणार आहेत याचा आढावा दरवर्षी ऑगस्ट महिन्यात किंवा त्यानंतर शक्य तितक्या लवकर घेण्यात यावा.

**ब)** वर नमूद केलेल्या आढाव्यानुसार पदोन्नतीने भरावयाच्या पदांची संख्या निश्चित झाल्यावर पदोन्नतीसाठी आवश्यक अर्हता धारण करणाऱ्या सर्व कर्मचाऱ्यांतून जेष्ठतानुक्रमाने पदांच्या संख्येच्या तिप्पट (१:३) कर्मचाऱ्यांचे विचारक्षेत्रात (Zone of Consideration) समावेशन करण्यात येईल.

**क)** ज्यांच्या विरुध्द विभागीय चौकशी चालू आहे व जे निलंबीत आहेत त्यांचीही नावे जेष्ठतानुक्रमे यादीत येत असल्यास ती अशा यादीतून वगळण्यात येवू नयेत. त्यांच्या नावाचा विचार केल्यावर निवड समितीचा अभिप्राय त्यांच्या नावासमोर नोंदविण्यात यावा. निवड समिती हया नावांची शिफारस करणे/नाकारणे सकारण ठरवेल.

**ड)** पदोन्नतीसाठी पात्र ठरलेल्या कर्मचाऱ्यांचा निवडसूचीत जेष्ठतेनुसार समावेश करण्यात येईल.

**इ)** दरवर्षी ऑक्टोबर महिन्यात किंवा त्यानंतर शक्य तितक्या लवकर निवड समितीच्या बैठका आयोजीत करण्यात येतील.

**फ)**निवड समिती कर्मचाऱ्यांचे मागील ५ वर्षाचे गोपनीय अहवालाचे अवलोकन करुन कर्मचाऱ्यांच्या पदोन्नतीच्या योग्यतेबद्दल निर्णय घेईल. मात्र असा निर्णय एकमताने झाला नाही तर त्याबद्दल अंतिम निर्णय समिती प्रमुखाचा असेल.

**ग)** निवड करतांना वेळोवेळी शासनाने निर्गमित केलेल्या आदेशानुसार पदोन्नती प्रक्रिया पार पाडली जाईल.

**ह)** कर्मचाऱ्यांच्या निवडीसंबंधी अंतिम निर्णय घेण्यापूर्वी अधिक माहितीची आवश्यकता वाटल्यास माहिती मागविण्याचा समितीस अधिकार असेल.

**ई)** पदोन्नतीसाठी शासनाने निर्धारित केल्यानुसार आरक्षण लागू राहील.

**ज)** पदोन्नतीने भरावयाच्या पदाकरिता प्रन्यासमध्ये पात्र अधिकारी उपलब्ध नसेल आणि पुढील तीन वर्षात पात्र अधिकारी उपलब्ध होण्याची शक्यता नसेल असे जर प्रन्यासचे मत झाले तर अशा परिस्थितीत प्रन्यास राज्य शासनाच्या संवर्गावर असलेल्या अधिकाऱ्यांमधून त्या पदाच्या समकक्ष दर्जा असलेल्या पात्र व योग्य अधिकाऱ्यांच्या सेवा शासनाच्या मान्यतेने प्राप्त करुन घेवू शकेल. मात्र सदर पदावर प्रन्यासमधील पात्र अधिकारी उपलब्ध होताच अशी प्रतिनियुक्ती त्वरीत संपुष्टात आणण्याचा अधिकार सभापतींना राहील.

४. निवड समितीने केलेली शिफारस नियुक्ती अधिकारी सभापती/विश्वस्त मंडळ यांचेकडे यथास्थिती मंजुरीसाठी ठेवली जाईल.

५. तयार करण्यात आलेली निवडसूची तयार केल्याच्या दिनांकापासून एक वर्षाच्या कालावधीकरीता वैध असेल.

६. श्रेणी-३ व श्रेणी-४ मध्ये सेवा भरती करताना शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्र.न्याप्र-१००३/९९/प्र.क्र.२/०३ (भाग-२)/१६अ दिनांक २५ ऑक्टोबर, २००५ अन्वये एकत्रित मार्गदर्शक तत्वांचा लागू असेल तेथे अवलंब करण्यात यावा. या मार्गदर्शक तत्वांमध्ये वेळोवेळी होणारे बदलही अंमलात आणण्यात यावेत.

७. तांत्रिक पदांना अतांत्रिक संवर्गामध्ये पदोन्नती देता येणार नाही.

**सभापती**

**नागपूर सुधार प्रन्यास नागपूर.**

<u>परिशिष्ट २</u>

<u>नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम १९३६ च्या कलम ८९ मधील पोट कलम (१) मधील उपकलम (क) अन्वये नेमणूक करण्याचे अधिकार असलेल्या पदांसाठी विहित शैक्षणिक व इतर अर्हता</u>

| अ.क्र. | सेवा संवर्ग | पदनाम | वेतनश्रेणी (पदांची संख्या) | नेमणूकीची पध्दत व टक्केवारी<br>१. नामनिर्देशन (सरळसेवा)<br>२. पदोन्नती<br>३. प्रतिनियुक्ती | नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दती |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | प्रशासकीय सेवा | महाव्यवस्थापक | -<br>(१) | शासनाकडून प्रतिनियुक्ती | राज्य शासनाकडून वेळोवेळी नेमणूक करण्यात येईल असा अतिरिक्त जिल्हाधिकारी किंवा समकक्ष दर्जाचा अधिकारी. |
| २ | प्रशासकीय सेवा | कार्यकारी अधिकारी | रू.१५६००-३९१००<br>ग्रेड वेतन रू.६६००<br>(१) | निवडीने<br>१०० % | (अ) कार्यकारी अधिकारी हे पद प्रन्यास आस्थापनेवरील पुढील संवर्गातील अधिकाऱ्यांमधून विभागीय पदोन्नती समिती व्दारे निवडीने भरण्यात येईल.<br>• स्थायी स्वरुपात कार्यकारी अभियंता<br>• सहाय्यक अभियंता श्रेणी १ या पदावरील किमान तीन वर्षांचा अनुभव असलेला अधिकारी<br>• प्रशासकीय /अतांत्रिक संवर्गातील गट 'अ' चे पदावरील किमान तीन वर्षांचा अनुभव असलेला अधिकारी<br>• प्रशासकीय /अतांत्रिक संवर्गातील गट 'ब' चे पदावरील किमान पाच वर्षांचा अनुभव असलेला अधिकारी<br>**याकरिता पात्रतेचे निकष पुढीलप्रमाणे राहतील.**<br>(१) मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी किंवा समकक्ष अर्हता.<br>(२) कायदयाची पदवी किंवा पदव्युत्तर किंवा व्यवसाय व्यवस्थापन मध्ये पदव्युत्तर पदविका/पदवी असणाऱ्या अधिकाऱ्यांना प्राधान्य.<br>(३) अधिकाऱ्यास वाचणे, लिहणे आणि अस्खलीतणे मराठीतून बोलणे याकरीता मराठीचे पर्याप्त ज्ञान आवश्यक. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | (४) या पदासाठी योग्यता किंवा अन्य बाबी संबंधीची पात्रता. अधिकाऱ्याच्या सेवाअभिलेखाचे सर्वकष मुल्यांकन केल्यानंतर निर्धारण करण्यात येईल.<br>**(ब)कार्यकारी अधिकारी या पदावरील नियुक्तीस शासनाची मान्यता आवश्यक राहील.** |
| ३ | प्रशासकीय सेवा | सहाय्यक कार्यकारी अधिकारी | रू.१५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.५४०० (१) | पदोन्नतीने १०० % | (१) सहाय्यक कार्यकारी अधिकारी हे पद नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामध्ये प्रशासकीय सेवेतील गट 'अ' मध्ये कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यामधून विभागीय पदोन्नती समितीव्दारे निवडीने भरण्यात येईल. याकरिता मान्यताप्राप्त विद्यापीठाची कला, वाणिज्य, विज्ञान, विधी शाखेची पदवी किंवा समकक्ष अर्हता आवश्यक राहील.<br>(२) वरीलप्रमाणे गट 'अ' मधील अधिकारी उपलब्ध नसल्यास प्रन्यास आस्थापनेवरील प्रशासकीय सेवेतील गट 'ब' मध्ये कार्यरत असलेल्या तसेच या पदाचा किमान तीन वर्षाचा अनुभव असलेल्या अधिकाऱ्यामधून विभागीय पदोन्नती समितीव्दारे पदोन्नतीने भरण्यात येईल. याकरिता मान्यताप्राप्त विद्यापीठाची कला, वाणिज्य, विज्ञान, विधी शाखेची पदवी किंवा समकक्ष अर्हता आवश्यक राहील.<br>(३) वाचणे, लिहणे आणि अस्खलीतपणे मराठीतून बोलणे याकरिता मराठीचे पर्याप्त ज्ञान आवश्यक. |
| ४ | प्रशासकीय सेवा | भुअर्जन अधिकारी | रू.१५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.५४०० (१) | शासनाकडून प्रतिनियुक्ती | आवश्यकतेनुसार शासनाच्या महसूल विभागातून उपजिल्हाधिकारी संवर्गातून प्रतिनियुक्ती. |
| ५ | प्रशासकीय सेवा | आस्थापना अधिकारी | रू.१५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.५४०० (१) | पदोन्नती १०० % | नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयातील प्रशासकीय वर्ग २ अधिकारी या पदाचा किमान तीन वर्षाचा अनुभव आवश्यक. |
| ६ | प्रशासकीय सेवा | सभापतींचे स्वीय सहाय्यक | रू.९३००-३४८०० ग्रेड वेतन रू.४६०० (१) | पदोन्नती १०० % | नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील लघुलेखक (उच्चश्रेणी) या पदावर किमान तीन वर्षाचा अनुभव. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ७ | प्रशासकीय सेवा | प्रशासकीय अधिकारी वर्ग-२ | रू.९३००-३४८०० ग्रेड वेतन रू.४४०० (६) | पदोन्नती १०० % | नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील शाखा अधिकारी या पदाचा किमान तीन वर्षाचा अनुभव आवश्यक. |
| ८ | प्रशासकीय सेवा | माहिती व जनसंपर्क अधिकारी | रू.९३००-३४८०० ग्रेड वेतन रू.४४०० (१) | नामनिर्देशन १०० % | (१) मान्यताप्राप्त विद्यापीठाची कला, वाणिज्य, विज्ञान, विधी यापैकी कुठल्याही शाखेची पदवी किंवा समकक्ष अर्हता आवश्यक.<br>(२) जर्नालिझमची/मास कम्युनिकेशन्स पदवी/पदविका आवश्यक.<br>(३) मराठी, हिंदी, इंग्रजी या भाषांवर प्रभूत्व असणे आवश्यक.<br>(४) ख्यातनाम वृत्तपत्र एजन्सीमध्ये कमीत कमी तीन वर्षाचा पर्यवेक्षणाचे कामाचा अनुभव आवश्यक.<br>लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |
| ९ | प्रशासकीय सेवा | लघुलेखक (उच्चश्रेणी) | रू.९३००-३४८०० ग्रेड वेतन रू.४४०० (३) | पदोन्नती १०० % | (१) लघुलेखनाचा वेग किमान १२० श.प्र.मि. आणि इंग्रजी टंलेखनाचा वेग किमान ४० श.प्र.मि. किंवा मराठी टंकलेखनाचा वेग किमान ३० श.प्र.मि. या अर्हतेचे शासकीय वाणीज्य प्रमाणपत्र.<br>(२) नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील लघुलेखक (निम्नश्रेणी) या पदावर किमान तीन वर्षाचा अनुभव आवश्यक. |
| १० | प्रशासकीय सेवा | शाखा अधिकारी | रू.९३००-३४८०० ग्रेड वेतन रू.४३०० (१६) | पदोन्नती १०० % | नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील वरिष्ठ स्तर लिपीक या पदावर किमान तीन वर्षाची सेवा आवश्यक. |
| ११ | प्रशासकीय सेवा | लघुलेखक (निम्नश्रेणी) | रू.९३००-३४८०० ग्रेड वेतन रू.४३०० (७) | पदोन्नती १०० % | (१) लघुलेखनाचा वेग किमान १०० श.प्र.मि. आणि इंग्रजी टंकलेखनाचा वेग किमान ४० श.प्र.मि. किंवा मराठी टंकलेखनाचा वेग किमान ३० श.प्र.मि. या अर्हतेचे शासकीय वाणीज्य प्रमाणपत्र. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | (२) नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील लघुटंकलेखक या पदावर किमान तीन वर्षाचा अनुभव आवश्यक. |
| **१२** | प्रशासकीय सेवा | वरिष्ठ स्तर लिपीक | रू. ५२००-२०२०० ग्रेड वेतन रू. ३५०० (४३) | पदोन्नती १०० % | नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील कनिष्ठ स्तर लिपीक या पदावर किमान तीन वर्षाची सेवा आवश्यक. |
| **१३** | प्रशासकीय सेवा | डिमॉलिशन इन्चार्ज | रू.५२००-२०२०० ग्रेड वेतन रू.२८०० (१) | नामनिर्देशन १०० % | हे पद जिल्हा सैनिक कार्यालयाकडून उमेदवारांची नांवे मागवून सरळ भरतीने भरण्यात येईल. लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदासाठी सेवामुक्त झालेले भारतीय सेनेतील भूदलातील हवालदार किंवा नौदल व वायुसेनेतील सकमक्ष पदांचे माजी सौनिकांमधून उमेदवाराची निवड करण्यात येईल. याकरिता माजी सैनिकांकरिता शासन सेवेसाठी विहित वयोमर्यादा लागू राहील.<br>लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |
| **१४** | प्रशासकीय सेवा | लघुटंकलेखक | रू.५२००-२०२०० ग्रेड वेतन रू.२४०० (९) | नामनिर्देशन १०० % | नागपूर सुधार प्रन्यास नागपूर या कार्यालयातील लघुटंकलेखक या पदावरील नेमणूका मराठी व इंग्रजी लघुटंकलेखक २:१ या प्रमाणात करण्यात येतील.<br>(१) एस.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक.<br>(२) राज्य शासनाची ८० श.प्र.मि. मराठी लघुलेखन आणि ३० आणि ४० श.प्र.मि. मराठी टंकलेखन किंवा ८० श.प्र.मि. इंग्रजी लघुलेखन आणि ४० श.प्र.मि. इंग्रजी टंकलेखन परीक्षा उत्तीर्ण.<br>लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदास दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १५ | प्रशासकीय सेवा | जड वाहन चालक | रू. ५२००-२०२०० ग्रेड वेतन रू. २००० (१६) | नामनिर्देशन ५०% पदोन्नतीने ५०% | **(अ) ५०% पदे नामनिर्देशनाने खालील शैक्षणिक अर्हता व पात्रतेच्या आधारे भरण्यात येईल.**<br>(१) महाराष्ट्र राज्य माधमिक व उच्च माधमिक शिक्षण मंडळाची १० वी इयत्ता उत्तीर्ण.<br>(२) प्रादेशिक परिवहन कार्यालयाचा जड वाहन चालविण्याचा अधिकृत/वैध परवाना आवश्यक.<br>(३) जड वाहन चालविण्याचा तीन वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>(४) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील.<br>**(ब) ५०% पदे** नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील हलके वाहनचालक या संवर्गातून पुढील अर्हता धारण करणा-या कर्मचा-यांमधून पुढीलप्रमाणे पदोन्नतीने भरण्यात येईल.<br>(१) नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील हलके वाहनचालक या पदाचा किमान तीन वर्षाचा अनुभाव आवश्यक.<br>(२) प्रादेशिक परिवहन कार्यालयाचा जड वाहन चालविण्याचा अधिकृत/वैध परवाना आवश्यक.<br>**(क)** पदोन्नतीने भरावयाच्या पदांसाठी पात्र उमेदवार उपलब्ध नसल्यास ही पदे सुध्दा नामनिर्देशनाद्वारे भरण्यात येतील. |
| १६ | प्रशासकीय सेवा | हलके वाहन चालक | रू. ५२००-२०२०० ग्रेड वेतन रू. १९०० (८) | नामनिर्देशन ५०% पदोन्नतीने ५०% | **(अ)** ५०% पदे नामनिर्देशनाने खालील शैक्षणिक अर्हता व पात्रतेच्या आधारे भरण्यात येईल.<br>(१) या पदासाठी महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळाची १० वी इयत्ता उत्तीर्ण.<br>(२) प्रादेशिक परिवहन कार्यालयाचा हलके वाहन चालविण्याचा अधिकृत/वैध परवाना आवश्यक. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | (३) हलके वाहन चालविण्याचा एक वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>(४) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.<br>लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील.<br>**(ब)** ५०% पदे नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील क्लिनर फायरमन या संवर्गातून पुढील अर्हता धारण करणा-या कर्मचा-यांमधून पुढीलप्रमाणे पदोन्नतीने भरण्यात येईल.<br>१) क्लिनर फायरमन या पदावरील किमान तीन वर्षाचा अनुभव<br>२) हलके वाहन चालवण्याचा अधिकृत/वैध परवाना आवश्यक राहील.<br>**(क)** क्लिनर फायरमन या संवर्गात पदोन्नतीकरिता पात्र कर्मचारी उपलब्ध नसल्यास ही पदे सुध्दा नामनिर्देशनाने भरण्यात येतील. |
| १७ | प्रशासकीय सेवा | कनिष्ठ स्तर लिपीक-टंकलेखक | रू. ५२००-२०२०० ग्रेड वेतन रू. १९०० (१०५) | नामनिर्देशन ५०%<br>पदोन्नती ५०% | **(अ)५०%** पदे नामनिर्देशनाने खालील शैक्षणिक अर्हता व पात्रतेच्या आधारे भरण्यात येईल.<br>(१) एस.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण.<br>(२) राज्य शासनाची (जी.सी.सी.) मराठी टंकलेखनाची ३० शप्रमि किंवा इंग्रजी टंकलेखनाची ४० शप्रमि परीक्षा उत्तीर्ण.<br>(३) उमेदवारास मराठी, इंग्रजी, हिंदी या विषयांचे पुरेसे ज्ञान असणे आवश्यक.<br>लेखी परीक्षेतील गुणवत्तेनुसार योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील.<br>**(ब)** ५०% पदे नागपूर सुधार प्रन्यासचे आस्थापनेवर कार्यरत असलेल्या गट "ड" मधील कर्मचाऱ्यांमधून पुढीलप्रमाणे पदोन्नतीने भरण्यात येतील.<br>(i) गट "ड" मधील तीन वर्ष सेवा पूर्ण तसेच एस.एस.सी. उत्तीर्ण असलेल्या इच्छुक कर्मचाऱ्यांची प्रन्यासतर्फे लेखी परीक्षा व टंकलेखन चाचणी घेण्यात येईल. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | (ii) लेखी परीक्षा व टंकलेखन चाचणीतील गुणवत्ता व आवश्यक गोपनीय अहवाल प्रतवारीचे आधारे उमेदवारांची पदोन्नतीकरीता निवड करण्यात येईल. |
| १८ | प्रशासकीय सेवा | छायायंत्र चालक | रू. ४४४०-७४४० ग्रेड वेतन रू. १६०० (२) | पदोन्नती १०० % | हे पद प्रन्यासमधील चतुर्थश्रेणी शिपाई/चौकीदार, कुली, खलाशी या पदावर कार्यरत असलेल्या किमान तीन वर्षे सेवा पूर्ण केलेल्या इच्छुक कर्मचाऱ्यांमधून त्यांच्या परस्पर जेष्ठता-अधीन-पात्रता या निकषावर पदोन्नतीने भरण्यात येईल. |
| १९ | प्रशासकीय सेवा | नोटिस हवालदार | रू. ४४४०-७४४० ग्रेड वेतन रू. १६०० (२) | पदोन्नती १०० % | नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील शिपाई/चौकीदार, कुली/खलाशी या पदावर किमान तीन वर्ष सेवा पूर्ण केलेल्या पुरुष कर्मचाऱ्यांमधून परस्पर जेष्ठता-अधीन-पात्रता या निकषावर पदोन्नतीने भरण्यात येतील. |
| २० | प्रशासकीय सेवा | शिपाई / चौकीदार | रू. ४४४०-७४४० ग्रेड वेतन रू. १३०० शिपाई ७६ चौकीदार १७ (एकूण पदे ९३) | नामनिर्देशन १०० % | (१) किमान चौथी इयत्ता उत्तीर्ण.<br>(२) शारिरिकदृष्टया सुदृढ असणे आवश्यक.<br>उपरोक्त किमान शेक्षणिक अर्हतेतील गुणवत्ता किंवा लेखी परीक्षेतील गुणवत्तेनुसार मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |

| अ.क्र. | सेवा संवर्ग | पदनाम | वेतनश्रेणी पद (संख्या) | नेमणूकीची पध्दत व टक्केवारी<br>४. नामनिर्देशन (सरळसेवा)<br>५. पदोन्नती<br>६. प्रतिनियुक्ती | नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दती |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| **१** | नगररचना सेवा | उप संचालक नगर रचना | रू. १५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.७६०० (१) | **पदोन्नती /प्रतिनियुक्ती/ सरळसेवा** | हे पद नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील सहाय्यक संचालक नगर रचना या पदाचा किमान तीन वर्षाचा अनुभव असलेल्या अधिका-यांमधून पदोन्नतीने भरण्यात येईल.<br>**(अ)** याकरिता पात्रतेचे निकष खालीलप्रमाणे राहतील.<br>(१) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा नागरी अथवा नगर रचना यामधील पदवी घेतल्यानंतर शासनाने मान्यता दिलेल्या संस्थेची वाहतुक व परिवहन रचना किंवा गृहनिर्माण यातील विशेषज्ञतेसह, कोणतीही असल्यास, नगर रचना किंवा नागरी रचना किंवा नगर व ग्राम रचना किंवा शहर रचना किंवा प्रादेशिक रचना किंवा पर्यावरण रचना यामध्ये मिळवलेली पदव्युत्तर पदवी, किंवा<br>(२) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा नागरी अथवा नगर रचना यांमधील पदवी घेतल्यानंतर स्कूल ऑफ प्लॅनिंग अँन्ड आर्किटेक्चर, नवी दिल्ली किंवा इतर कोणतेही सांविधिक विद्यापीठ किंवा मान्यताप्राप्त संस्था यांमधील नागरी रचना किंवा नगर रचना किंवा नगर व ग्राम रचना किंवा वाहतुक व परिवहन रचना किंवा नागरी संकल्पचित्र किंवा पर्यावरण रचना यांमधील पदव्युत्तर पदविका, किंवा<br>(३) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र यांमधील पदवी घेतल्यानंतर, नगर रचनाकार संस्था, भारत, नवी दिल्ली यांनी संचालित केलेली परीक्षा उत्तीर्ण होऊन नगर रचनाकार संस्था, भारत, नवी दिल्ली यांचे मिळालेले सहयोगी सदस्यत्व, |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | (४) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा नागरी किंवा नगर रचना यांमधील पदवी घेतल्यानंतर शासनाकडून नगर रचना यामध्ये त्याच्याशी समकक्ष मानली जाणारी इतर कोणतीही पदव्युत्तर अर्हता<br>**(ब) उपसंचालक नगर रचना या पदावरील नियुक्तीस शासनाची मान्यता आवश्यक राहील.**<br>**(क) पदोन्नतीने उमेदवार उपलब्ध न झाल्यास सदरचे पद शासनाकडून प्रतिनियुक्तीने भरण्यात येईल. अथवा शासनाकडील समकक्ष पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार सरळसेवेने भरण्यात येईल.** |
| २ | नगररचना सेवा | सहाय्यक संचालक नगररचना | रू.१५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.६६०० (१) | **पदोन्नती/ प्रतिनियुक्तीने/ सरळसेवेने** | हे पद नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील नगर रचनाकार किंवा सहाय्यक अभियंता श्रेणी-एक (स्थापत्य) या पदावरील अधिका-यांमधून पदोन्नतीने भरण्यात येईल.<br>**याकरिता पात्रतेचे निकष खालीलप्रमाणे राहतील**.:-<br>(१) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा नागरी ग्रामीण अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा बांधकाम तंत्रज्ञान किंवा नागरी रचना यामधील पदवी किंवा मान्यताप्राप्त विद्यापीठाची समकक्ष अर्हता मिळविल्यानंतर नागपूर सुधार प्रन्यासमधील नगर रचनाकार म्हणून तीन वर्षापेक्षा कमी नसेल इतकी नियमित सेवा झालेल्या, किंवा<br>(२) स्थापत्य अभियांत्रिकी किंवा नागरी ग्रामीण अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा बांधकाम तंत्रज्ञान किंवा नागरी रचना यामधील पदवी किंवा मान्यताप्राप्त विद्यापीठाची समकक्ष अर्हता मिळविल्यानंतर नागपूर सुधार प्रन्यासमधील सहाय्यक अभियंता श्रेणी-एक या पदाचा किमान पाच वर्षांचा अनुभव आणि नगर नियोजन कामाचा किमान तीन वर्षांचा अनुभव आवश्यक, किंवा<br>(३) नागपूर सुधार प्रन्यासमध्ये नगर रचनाकार म्हणून आठ वर्षापेक्षा कमी नसेल इतकी नियमित सेवा झालेल्या आणि स्थापत्य अभियांत्रिकी मधील किंवा मान्यताप्राप्त संस्थेतून त्यांच्याशी समकक्ष असलेली पदविका धारण केलेल्या, किंवा |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | (४) नागपूर सुधार प्रन्यासमध्ये सहाय्यक अभियंता श्रेणी-एक म्हणून आठ वर्षापेक्षा कमी नसेल इतकी नियमित सेवा ज्यामध्ये तीन वर्षांचा नगर नियोजन कामाचा अनुभव असेल आणि स्थापत्य अभियांत्रिकी मधील किंवा मान्यताप्राप्त संस्थेतून त्यांच्याशी समकक्ष असलेली पदविका धारण केलेल्या योग्य व्यक्तीच्या पदोन्नतीद्वारे करण्यात येईल.<br>(५) **पदोन्नतीने उमेदवार उपलब्ध न झाल्यास सदरचे पद शासनाकडून प्रतिनियुक्तीने भरण्यात येईल. अथवा शासनाकडील समकक्ष पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार सरळसेवेने भरण्यात येईल.** |
| ३ | नगररचना सेवा | नगर रचनाकार | रू.१५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.५४०० (२) | **पदोन्नती ५०% प्रतिनियुक्तीने /सरळसेवेने ५०%** | **(अ)** नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयमधील सहाय्यक नगर रचनाकार (गट ब) या पदाचा किमान तीन वर्षाचा अनुभव.<br>**(ब)** नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयात सहाय्यक नगर रचनाकार या संवर्गात वरील अर्हता असलेला पात्र उमेदवार नसल्यास, हे पद सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) यांचे मधून पदोन्नतीने भरण्यात येईल. याकरिता सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) या पदावरील किमान तीन वर्षांचा अनुभव आवश्यक.<br>**(क) ५०% पदोन्नतीने व ५०% शासनाकडून प्रतिनियुक्तीने भरण्यात येईल. अथवा शासनाकडील समकक्ष पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार सरळसेवेने भरण्यात येईल.** |
| ४ | नगररचना सेवा | सहाय्यक नगर रचनाकार | रू.९३००-३४८०० ग्रेड वेतन रू.४४०० (२) | **पदोन्नती ५० %**<br><br>**प्रतिनियुक्तीने/ सरळसेवेने ५० %** | **(अ) नामनिर्देशनाकरिता**<br>(१) मान्यताप्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रिकी किंवा नागरी व ग्रामीण अभियांत्रिकी किंवा शहरी व ग्रामीण अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा बांधकाम तंत्रज्ञान किंवा शहर नियोजन यांमधील पदवी अथवा समतुल्य अर्हता धारण करीत आहेत.-<br>अशा उमेदवारांमधून एका उमेदवारास नामनिर्देशित करून करण्यात येईल.<br>(२)लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल.<br>(३) या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | **(ब) पदोन्नतीकरिता**<br>नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील रचना सहाय्यक या पदाचा किमान तीन वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>**(क)** ५०% पदोन्नतीने व ५०% शासनाकडून प्रतिनियुक्तीने भरण्यात येईल. अथवा शासनाकडील समकक्ष पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार सरळसेवेने भरण्यात येईल. |
| ५ | नगररचना सेवा | रचना सहाय्यक | रू.९३००-३४८०० ग्रेड वेतन रू.४३०० (४) | नामनिर्देशन १०० % | खालील अटी पूर्ण करणा-या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने -<br>(१) ज्यांनी स्थापत्य अभियांत्रीकी किंवा स्थापत्य आणि ग्रामीण अभियांत्रिकी किंवा नागरी व ग्रामीण अभियांत्रिकी किंवा वास्तुशास्त्र किंवा बांधकाम तंत्रज्ञान यामधील मान्यताप्राप्त संस्थेची तीन वर्षांची पदविका किंवा तत्सम शैक्षणीक अर्हता धारण केली आहे<br>(२) लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरीता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |
| ६ | नगररचना सेवा | कनिष्ठ आरेखक | रू.५२००-२०२०० ग्रेड वेतन रू.२४०० (२) | नामनिर्देशन १०० % | (१) एस.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण.<br>(२) शासनमान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतून स्थापत्य आरेखकाचा पाठयक्रम उत्तीर्ण.<br>लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |
| ७ | नगररचना सेवा | ट्रेसर | रू. ५२००-२०२०० ग्रेड वेतन रू. २००० (२) | नामनिर्देशन १०० % | (१) एस.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण.<br>(२) महाराष्ट्र शासनाची इन्टरमिडिएट ग्रेड ड्रॉईंग परीक्षा किंवा समकक्ष परीक्षा उत्तीर्ण.<br>लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८ | नगररचना सेवा | फेरो अटेन्डन्ट | रू. ४४४०-७४४० ग्रेड वेतन रू. १६०० (२) | पदोन्नती १०० % | **(अ)** नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील चतुर्थश्रेणी शिपाई/चौकीदार, कुली व खलाशी या पदावर किमान ३ वर्ष सलग सेवा केलेल्या इच्छुक कर्मचा-यांमधून त्यांच्या परस्पर जेष्ठता-अधीन-पात्रता या निकषावर पदोन्नतीने भरण्यात येईल.<br>**(ब)** नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयात फेरो अटेन्डन्ट या पदासाठी पात्र चपराशी उपलब्ध नसल्यास हे पद स्थानिक वर्तमानपत्रात जाहिरात देवून तसेच सेवायोजन कार्यालयातून उमेदवारांची नांवे मागवून नामनिर्देशनाने खालील शैक्षणिक अर्हता व पात्रतेच्या आधारे भरण्यात येईल.<br>(१) एस.एस.सी. उत्तीर्ण असावा.<br>(२) एक वर्षाचा फेरो प्रिंटीगचे कामाचा अनुभव आवश्यक.<br>लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |

| अ.क्र. | सेवा संवर्ग | पदनाम | वेतनश्रेणी पद (संख्या) | नेमणूकीची पध्दत व टक्केवारी<br>१) नामनिर्देशन (सरळसेवा)<br>२)पदोन्नती<br>३)प्रतिनियुक्ती | नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दती |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | लेखा सेवा | मुख्य लेखा व वित्त अधिकारी | रू.१५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.५४०० (१) | शासनाकडून प्रतिनियुक्ती | शासनाकडील महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील गट 'अ' च्या अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने |
| २ | लेखा सेवा | लेखा अधिकारी | रू.९३००-३४८०० ग्रेड वेतन रू.४४०० (१) | पदोन्नती/शासनाकडून प्रतिनियुक्ती | शासनाकडील महाराष्ट्र वित्त व लेखा सेवेतील गट 'ब' च्या अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने |

| अ.क्र. | सेवा संवर्ग | पदनाम | वेतनश्रेणी पद (संख्या) | नेमणूकीची पध्दत व टक्केवारी १)नामनिर्देशन (सरळसेवा) २)पदोन्नती ३)प्रतिनियुक्ती | नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दती |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | विधी सेवा | विधी अधिकारी | रू.१५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.५४०० (१) | पदोन्नती १०० % | **(अ)** नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील सहाय्यक विधी अधिकारी या पदाचा किमान तीन वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>**(ब)** नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयात **विधी अधिकारी या पदासाठी पात्र सहाय्यक विधी अधिकारी उपलब्ध नसल्यास हे पद स्थानिक वर्तमानपत्रात जाहिरात देवून नामनिर्देशनाने खालील** शैक्षणिक अर्हता व पात्रतेच्या आधारे भरण्यात येईल.<br>(१) मान्यताप्राप्त विद्यापीठाची विधी शाखेतील पदवी आवश्यक.<br>(२) कायदयाची सनद असणे आवश्यक.<br>(३) वकीली व्यवसायाचा मा. उच्च न्यायालय व जिल्हास्तरीय न्यायालयातील दिवाणी प्रकरणांचा किमान सात वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>(४) शासकीय/निमशासकीय विभागांचे पॅनलवर अधिवक्ता म्हणून कार्यरत असलेल्या उमेदवारांस प्राधान्य.<br>लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. नामनिर्देशनाने नियुक्ती झाल्यास दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |
| २ | विधी सेवा | सहाय्यक विधी अधिकारी | रू.९३००-३४८०० ग्रेड वेतन रू.४४०० (१) | नामनिर्देश १०० % | (१) मान्यताप्राप्त विद्यापीठाची कायदयाची पदवी आवश्यक.<br>(२) कायदयाची सनद आवश्यक.<br>(३) वकीली व्यवसायाचा किमान पाच वर्षाचा मा.उच्च न्यायालय व जिल्हास्तरीय न्यायालय या दोन्ही न्यायालयातील दिवाणी प्रकरणांचा अनुभव आवश्यक.<br>(४) शासकीय/निमशासकीय विभागांचे पॅनलवर अधिवक्ता म्हणून कार्यरत असलेल्या उमेदवारांस प्राधान्य<br>(५) उमेदवारांस मराठी, हिंदी, इंग्रजी या विषयांचे पुरेसे ज्ञान आवश्यक.<br>लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |

| अ.क्र. | सेवा संवर्ग | पदनाम | वेतनश्रेणी पद (संख्या) | नेमणूकीची पध्दत व टक्केवारी १)नामनिर्देशन (सरळसेवा) २)पदोन्नती ३)प्रतिनियुक्ती | नेमणूकीकरीता अर्हता व नेमणूकीच्या पध्दती |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ०१ | उद्यान सेवा | उद्यान अधिक्षक | रू.१५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.५४०० (१) | नामनिर्देशन १०० % | (१) शासनप्राप्त कृषी विद्यापीठाची बी.एस्सी. उद्यान विषयक (Horticulture) ही किमान द्वितीय श्रेणीतील पदवी आवश्यक.<br>(२) शासकीय व मान्यताप्राप्त स्थानिक संस्था अथवा मंडळ येथील उद्यान विषयक कामाचा तीन वर्षाचा अनुभव आवश्यक.<br>(३) उमेदवारास मराठी, इंग्रजी, हिंदी या विषयाचे पुरेसे ज्ञान आवश्यक. लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदास दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील.<br>उद्यान विषयक (Horticulture) मधील पदव्युत्तर पदवी असल्यास प्राधान्य. |
| ०२ | उद्यान सेवा | प्रमुख माळी | रू. ५२००-२०२०० ग्रेड वेतर रू. २४०० (१) | पदोन्नती १०० % | नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयामधील सहाय्यक माळी या पदावर किमान तीन वर्षाचा अनुभव आवश्यक. |
| ०३ | उद्यान सेवा | सहाय्यक माळी | रू. ५२००-२०२०० ग्रेड वेतन रू. १८०० (१२) | नामनिर्देशन १०० % | (१) एस.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण.<br>(२) मान्यताप्राप्त कृषी विद्यापीठाचा एक वर्षाचा माळी प्रशिक्षण पाठयक्रम उत्तीर्ण.<br>(३) लेखी परीक्षा व वैयक्तिक मुलाखतीद्वारे योग्य उमेदवाराची निवड करण्यात येईल. या पदाकरिता दोन वर्षाचा परिविक्षा कालावधी राहील. |

**सभापती**
**नागपूर सुधार प्रन्यास नागपूर**